अपर जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची दिनांक ०१.०१.२०१७ ते दि.३१.१२.२०२४ या कालावधीची दि.०१.०१.२०२५ ची स्थिती दर्शविणारी एकत्रित अंतिम ज्येष्ठतासूची.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः एसएनटी-२०२५/प्र.क्र. ०१/ई-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक - १३ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:-**

१. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन (महसूल व वन) विभाग, क्र. आरसीटी-११७४/१९१६-II/ई-३, दि.२१.०५.१९७७.
२. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. एसएनटी-१२०५/प्र.क्र. १३/ई-३, दिनांक ०६.०२.२००९.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही- २०११/प्र.क्र. २८४/१२, दिनांक २१.१०.२०११.
४. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. एसएनटी-२०१४/प्र.क्र. ११/ई-१ अ, दिनांक २६.०३.२०१५.
५. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. एसएनटी-२०१४/प्र.क्र. २९/ई-१ अ, दिनांक ०५.०७.२०१६.
६. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. एसएनटी-२०१५/प्र.क्र. ६६/ई-१ अ, दिनांक ०३.०५.२०१७.
७. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/१२, दि.२१.०६.२०२१.
८. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. एसएनटी-२०१७/प्र.क्र. २१/ई-१ अ, दिनांक ०५.०७.२०२१.
९. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. एसएनटी-२०२१/प्र.क्र. ५२/ई-१ अ, दिनांक ०५.०८.२०२१.
१०. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथील मुळ अर्ज क्र. टीए ०१/२०२२ व टीए ०२/२०२२ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दिनांक २६.०८.२०२२ रोजी दिलेला निर्णय.
११. मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.११६९२/२०२२ व रिट याचिका क्र.११७६२/२०२२, रिट याचिका क्र.९१६३/२०२२, रिट याचिका क्र.१२६९९/२०२२, रिट याचिका क्र.१२६७५/२०२२, रिट याचिका क्र.९६३१/२०२२ व रिट याचिका क्र.९६३२/२०२२ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दिनांक ०८.०८.२०२४ रोजी दिलेल्या न्यायनिर्णय
१२. मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल विशेष अनुमती याचिका (SLP) क्र. १९८७०/२०२४ मध्ये दिनांक ०२.०९.२०२४.
१३. महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः एसएनटीई/०१ .क्र.प्र/२०२५--१, दिनांक ०३.०१.२०२५

**परिपत्रक-**

महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियम) नियम, १९८२ नुसार शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांची प्रत्येक संवर्गाची ज्येष्ठतासूची दरवर्षी १ जानेवारी हा आधारभूत दिनांक म्हणून प्रसिध्द करण्याची तरतूद आहे. यासंदर्भात, सदर नियमावलीमध्ये मार्गदर्शक तत्वे विहित केलेली आहेत. तथापि, सदर ज्येष्ठतासूच्या या नियमितपणे प्रसिद्ध केल्या जात नसल्याचे निदर्शनास आल्याने प्रत्येक संवर्गाची ज्येष्ठतासूची दरवर्षी न चुकता प्रसिध्द करण्याबाबत शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दि.२१.१०.२०११ अन्वये धोरण तयार करण्यात येऊन त्या ज्येष्ठतासूच्या कशा पद्धतीने तयार कराव्यात, याबाबतही सूचना दिलेल्या होत्या. आता दि.२१.०६.२०२१ च्या शासन अधिसूचनेन्वये दि. २१.०६.१९८२ रोजी अधिसूचित केलेली महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली व त्यासंदर्भातील निर्गमित केलेले सर्व आदेश किंवा अभिलेख अधिक्रमित करुन महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ प्रसिध्द करण्यात आले आहेत.

२. संदर्भ क्र. ८ अन्वये, महसूल विभागाने अपर जिल्हाधिकारी संवर्गातील त्या-त्या वर्षी पदोन्नती झालेल्या अधिका-यांची दिनांक ०१.०१.२०१२ ते ३१.१२.२०१६ या कालावधीची दिनांक ०१.०१.२०१७ ची स्थिती दर्शविणारी अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०५.०७.२०२१ रोजी प्रसिध्द केली आहे. तसेच, आता, अपर जिल्हाधिकारी संवर्गात त्या-त्यावर्षी पदोन्नत झालेल्या अधिका-यांची दिनांक ०१.०१.२०१७ ते दिनांक ३१.१२.२०२४ या कालावधीची दिनांक ०१.०१.२०२५ ची स्थिती दर्शविणारी अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात येत आहे. यापुढे, दिनांक ०१.०१.२०२५ ते दिनांक ३१.१२.२०२५ या कालावधीची दिनांक ०१.०१.२०२६ रोजीची स्थिती दर्शविणारी अपर जिल्हाधिकारी संवर्गाची कार्यरत सर्व अधिका-यांच्या नावांचा समावेश असलेली एकत्रित ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्याबाबतची कार्यवाही विभागामार्फत करण्यात येईल.

तद्नंतर, संदर्भ क्र. ९ अन्वये, अपर जिल्हाधिकारी संवर्गाची दिनांक ०१.०१.२०१७ ते दिनांक ३१.१२.२०१९ या कालावधीची दिनांक ०१.०१.२०२० रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती ज्येष्ठतासूची दिनांक ०५.०८.२०२१ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती.

३. अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमानुसार सदर सवंर्गातील पदे ही १०० टक्के पदोन्नतीने भरण्यात येतात. सन १९९९ ते २००३ या कालावधीची दिनांक ०१.०१.२००४ रोजीची स्थिती दर्शविणारी दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द करण्यात आलेली उप जिल्हाधिकारी संवर्गाची अंतिम जेष्ठतासूची संदर्भ क्र. ११ येथील मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे आदेश विचारात घेता कायम राहिली आहे. सदर दिनांक ३१.१२.२०२० रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची विचारात घेऊन अपर जिल्हाधिकारी संवर्गात निवडसूची वर्ष २०१५-१६, वर्ष २०१९-२० व वर्ष २०२१-२२ मध्ये तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेल्या पदोन्नत्या नियमित करण्याबाबतचा प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास सामान्य प्रशासन विभागाने दिनांक ३१.१२.२०२४ च्या इतिवृत्तान्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या सुधारीत निवडसुच्यांना शासनाची मान्यता प्राप्त करुन घेण्यात आली आहे.

४. यापुर्वी दिनांक ०५.०८.२०२१ च्या शासन परिपत्रकान्वये, अपर जिल्हाधिकारी संवर्गाची सन २०१७ ते २०१९ या कालावधीची दिनांक ०१.०१.२०२० रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती ज्येष्ठतासूची प्रसिध्द केली आहे. परंतु, उपरोक्त परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सन

२०१५- २०१६ व त्यापुढील निवडसुच्या सुधारीत करण्यात आल्या असल्याने सन २०१७ ते २०१९ या कालावधीच्या तात्पुरती ज्येष्ठतासूचीमध्ये देखील बदल होत आहे. परिणामी, अपर जिल्हाधिकारी संवर्गाची सन २०१७ ते २०१९ या कालावधीची व दिनांक ०१.०१.२०२० रोजीची स्थिती दर्शविणारी दिनांक ०५.०८.२०२१ रोजी प्रसिध्द केलेली तात्पुरती ज्येष्ठतासूची अधिक्रमित करुन सामान्य प्रशासन विभागाने मान्यता दिलेल्या सुधारीत निवडसुच्यांच्या आधारे दिनांक ०१.०१.२०१७ ते ३१.१२.२०२४ या कालावधीची व दिनांक ०१.०१.२०२५ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती ज्येष्ठतासूची दिनांक ०३.०१.२०२५ रोजी प्रसिध्द करण्यात आली होती.

शासन कार्यपध्दतीनुसार एखादा नवीन आदेश निर्गमित करतेवेळी त्या बाबींसदंर्भात यापूर्वी घेतलेले आदेश अधिक्रमित केले जातात. परंतु, पूर्वीच्या आदेशाव्दारे घेतलेल्या निर्णयास/केलेल्या कृतीस संरक्षण प्राप्त होत असते. या प्रचलित कार्यपध्दतीनुसार दि. ०३.०१.२०२५ रोजी प्रकाशित केलेल्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीव्दारे दिनांक ०५.०८.२०२१ रोजी प्रकाशित केलेली तात्पुरती ज्येष्ठतासूची अधिक्रमित केली आहे. त्यानुसार, दिनांक ०५.०८.२०२१ रोजी प्रकाशित ज्येष्ठतासूचीचा वापर करुन देण्यात आलेल्या पदोन्नत्यांना संरक्षण देण्यात येत आहे.

५. अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या सदर तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीबाबत संबंधित अधिका-यांकडून आक्षेप/हरकती मागविण्यात आल्या होत्या. सदर आक्षेप/हरकती/सुचना विचारात घेण्याच्या अनुषंगाने ज्या अधिका-यांनी प्रत्यक्ष सुनावणीकरीता वेळ मागविली होती, त्या अधिका-यांना प्रत्यक्ष सुनावणीकरीता दिनांक २२.०१.२०२५ रोजी वेळ देण्यात आली होती. त्याअनुषंगाने संबंधित अधिका-यांनी उपस्थित केलेले आक्षेप/हरकती/सुचना नियमानुसार तपासून आवश्यकतेनुसार सदर ज्येष्ठतासूची अंतिम करतेवेळी विचारात घेण्यात आल्या आहेत. सदर आक्षेप व त्याअनुषंगाने विभागाचे अभिप्राय ज्येष्ठतासूचीच्या **"प्रपत्र-अ"** मध्ये नमूद केले आहेत. तसेच, अपर जिल्हाधिकारी संवर्गात कार्यरत असलेल्या अधिका-यांची नावे व इतर सेवा तपशिल **"प्रपत्र-ब"** मध्ये व ज्या अधिका-यांची प्रकरणे खुले ठेवण्यात आली आहेत, अशा अधिका-यांची नावे व इतर सेवा तपशिल **"प्रपत्र-क"** मध्ये दर्शविण्यात आली आहेत.

६. उप जिल्हाधिकारी संवर्गाची दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द अंतिम जेष्ठतासूचीच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र. १०२६३/२०२३ मधील अंतरिम याचिका क्र. १५२१२/२०२४ व रिट याचिका क्र. १५२१३/२०२४ मधील अंतरिम याचिका क्र. १०२६३/२०२३ मध्ये मा. न्यायाधिकरणाने दिनांक १२.१२.२०२४ रोजी दिलेल्या अंतिम आदेशानुसार मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, येथे दाखल मूळ अर्ज क्र. २३६/२०२१ (श्री. के. सूर्यकृष्णमुर्ती वि. महाराष्ट्र शासन व इतर) व मूळ अर्ज क्र.२३७/२०२१ (श्री. अजिंक्य पडवळ वि. महाराष्ट्र शासन व इतर), मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मुळ अर्ज क्र. १५२२/२०२४ (श्री. के. सूर्यकृष्णमुर्ती वि. महाराष्ट्र शासन व इतर), तसेच, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे मूळ अर्ज क्र. २२२/२०२२ (श्री. अण्णासाहेब शिंदे व इतर वि. महाराष्ट्र शासन व इतर) मध्ये मा. न्यायाधिकरणाने दि. २९.०३.२०२३ रोजी पारित केलेल्या आदेशाविरुद्ध मा. उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट याचिका क्र. ५८२१/२०२३ (महाराष्ट्र शासन वि. श्री. अण्णासाहेब शिंदे) या प्रलंबित न्यायालयीन प्रकरणांमध्ये होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहुन तसेच, मा. उच्च न्यायालय, मुंबई व मा. सर्वोच्च न्यायालय येथे पदोन्नती आरक्षण व सेवाज्येष्ठतासंदर्भात दाखल

असलेल्या सर्व प्रलंबित याचिकांमध्ये होणा-या न्यायनिर्णयांच्या अधीन राहून तसेच, सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळ क्र. २ ने दिलेल्या मान्यतेनुसार अपर जिल्हाधिकारी संवर्गाची **दिनांक ०१.०१.२०१७ ते दिनांक ३१.१२.२०२४ या कालावधीची व दिनांक ०१.०१.२०२५ रोजीची स्थिती दर्शविणारी अंतिम ज्येष्ठतासूची सोबतच्या "प्रपत्र-अ" "प्रपत्र-ब" व " प्रपत्र-क "** प्रमाणे प्रसिध्द करण्यात येत आहे.

७. सर्व विभागीय आयुक्तांना विनंती करण्यात येते की, सदर तात्पुरती ज्येष्ठतासूची त्यांच्या विभागातील सर्व अपर जिल्हाधिकारी यांना (प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिकाऱ्यांसह) वितरित करावी व त्याबाबतची पोच घेण्यात यावी. तसेच सदर अंतिम ज्येष्ठतासूची विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी कार्यालयातील सूचनाफलकांवर लावून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२५०२१३१५२६४२२८१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2025.02.13 15:29:22 +05'30'

**( महेश वरुडकर )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हाधिकारी
३. सर्व संबंधित अपर जिल्हाधिकारी (विभागीय आयुक्तांमार्फत)
४. निवडनस्ती (ई-१)

शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२५/प्रक्र ०१/ई-१, दिनांक १३.०२.२०२५ सोबतचे

**प्रपत्र- अ**

**दिनांक ०१.०१.२०१७ ते दिनांक ३१.१२.२०२४ या कालावधीतील अपर जिल्हाधिकारी संवर्गातील तात्पुरत्या ज्येष्ठता सूचीस प्राप्त आक्षेप व विभागाचे अभिप्राय**

| अ. क्र | अधिका-याचे नाव | तात्पु. ज्येष्ठता सूची तील क्रमांक | अंतिम ज्येष्ठता सूची तील क्रमांक | आक्षेप | विभागाचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १. | श्री. रविकांत कटकधोंड | ११० | ११० | अपर जिल्हाधिकारी पदावर माझी पदोन्नती ही दि.३०.०१.२०२० रोजी करण्यात आली असल्याने पदोन्नतीचा दिनांक हा १८.०२.२०२२ ऐवजी ३०.०१.२०२० असा नोंदविण्यात यावा. | महसूल व वन विभागाने सन २०१७ ते सन २०२२ या कालावधीत झालेल्या सर्व तात्पुरत्या/तदर्थ पदोन्नत्या सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळाच्या सहमतीने नियमित केल्या आहेत. श्री. कटकधोंड यांना जरी ३१.०१.२०२० रोजी पदोन्नती देण्यात आली होती. तरी, त्यांना निवडसूची वर्ष सन २०२१-२२ मध्ये स्थान प्राप्त झाले आहे. |
| २. | श्रीमती स्नेहल प्रताप भोसले | १२० | १२० | माझे नाव लग्नानंतर “सौ. स्नेहल प्रताप भोसले” असे बदलण्यात आले आहे, त्यानुसार ज्येष्ठता सूचीत बदल करण्यात यावा. | “श्रीमती स्नेहल हिंदुराव पाटील” यांचे लग्नानंतरचे नाव “सौ. स्नेहल प्रताप भोसले” असे बदलण्यात येत आहे. |
| ३. | श्रीमती नयना बोंदार्डे | - | - | सदर तात्पुरत्या ज्येष्ठता सूचीमध्ये माझा समावेश करण्यात आला नाही, तरी सदरील अंतिम ज्येष्ठता सूची मध्ये माझ्या नावाचा समावेश करण्यात यावा. | अपर जिल्हाधिकारी संवर्गाची<br>१. दिनांक ०१.०१.२००६ ते दिनांक ३१.१२.२०१० या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०५.०७.२०१६ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे.<br>२. दिनांक ०१.०१.२०११ ते दिनांक ३१.१२.२०११ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०३.०५.२०१७ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे.<br>३. दिनांक ०१.०१.२०१२ ते दिनांक ३१.१२.२०१६ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०५.०७.२०२१ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे.<br>प्रसंगत: नमूद करण्यात येते की, महसूल व वन विभागाने यापुर्वी वेळोवेळी ज्या-ज्या अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द केल्या, अशा सर्व ज्येष्ठतासूचीमध्ये केवळ त्या-त्या वर्षी पदोन्नत झालेल्या अपर जिल्हाधिका-यांच्या नावाचा समावेश |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | होता. आणि त्या सर्व अंतिम ज्येष्ठतासूची कायम राहिल्या आहेत. श्रीमती बोदार्डे हया विमाप्र प्रवर्गातील अधिकारी असून अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या दिनांक ०१.०१.२०१२ ते दिनांक ३१.१२.२०१६ या कालावधीची व दिनांक ०१.०१.२०१७ रोजीची स्थिती दर्शविणा-या व शासन परिपत्रक, दिनांक ०५.०७.२०२१ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या ज्येष्ठतासूचीमध्ये अनु. क्र. ५३ येथे श्रीमती नयना बोदार्डे यांच्या नावाचा उल्लेख करण्यात आला आहे. |
| ४. | डॉ. नवनाथ मुकन जरे | ५७ | ५७ | १) माझ्या नावात डॉ. नवनाथ मुकन जरे असा बदल करण्यात यावा.<br>२) माझा नियमित पदोन्नतीचा दिनांक श्री.दिपक क्षीरसागर यांच्याप्रमाणे ३०.०१.२०२० ऐवजी ०३.१०.२०१७ असा करण्यात यावा. | सेवापुस्तकातील नोंद विचारात घेता, "डॉ. नवनाथ मुकन जरे" असा उल्लेख करण्यात येत आहे..<br>श्री. दिपक क्षीरसागर हे अजा प्रवर्गातील अधिकारी असून दिनांक ३१.१२.२०२० रोजीच्या उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेनुसार त्यांना निवडसूची वर्ष २०१५-१६ मध्ये आरक्षणाचा लाभ प्राप्त होऊन दिनांक ०३.१०.२०१७ हा नियमित पदोन्नतीचा दिनांक मंजूर झाला आहे.<br>पदोन्नतीतील आरक्षणांबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या प्रचलित धोरणानुसार तसेच, नियमानुसार उचित कार्यवाही करण्यात येईल. |
| ५. | श्रीमती रेश्मा राजेश माळी | ८५ | ८५ | उपजिल्हाधिकारी संवर्गाचे अंतिम ज्येष्ठता यादीमध्ये माझ्यापेक्षा कनिष्ठ स्थानावर असणारे श्री. दत्तप्रसाद नडे यांना माझ्या नंतरचा ज्येष्ठता दिनांक देण्यात यावा. | श्री. दत्तप्रसाद नडे हे विमाप्र प्रवर्गातील अधिकारी असून दिनांक ३१.१२.२०२० रोजीच्या उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेनुसार निवडसूची वर्ष २०१५-१६ मध्ये आरक्षणाचा लाभ प्राप्त होऊन त्यांना दिनांक ०३.१०.२०१७ हा नियमित पदोन्नतीचा दिनांक मंजूर झाला आहे.<br>पदोन्नतीतील आरक्षणांबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या प्रचलित धोरणानुसार तसेच, नियमानुसार उचित कार्यवाही करण्यात येईल. |
| ६. | श्रीमती स्नेहल रविंद्र बर्गे | ५० | ५० | माझ्या नावाचा समावेश सा.प्र.वि. च्या दि.१९.०३.२०२० च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या आस्थापना मंडळ क्र.२ च्या शिफारसीनुसार निम्न | महसूल व वन विभागाने उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द झालेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीच्या आधारे अपर |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | संवर्गातील सेवा ज्येष्ठतेनुसार श्री.विजय भाकरे (ज्ये.क्र.२४) यांच्यानंतर आणि श्री.त्रिगुण कुलकर्णी (ज्ये.क्र.२५)यांच्या पूर्वी सेवा ज्येष्ठप्रमाणे दुरुस्त करून अपर जिल्हाधिकारी पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक माझ्या ज्येष्ठतेनुसार दि.०३.१०.२०१७ देण्यात यावा. | जिल्हाधिकारी संवर्गात सन २०१७ ते सन २०२२ या कालावधीत झालेल्या सर्व तात्पुरत्या/तदर्थ पदोन्नत्या सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळाच्या सहमतीने नियमित केल्या आहेत. श्रीमती बर्गे यांना कनिष्ठ असलेले श्री. त्रिगुण शामराव कुलकर्णी यांना दिनांक ०३.१०.२०१७ रोजीचा नियमित दिनांक देण्यात आला आहे. परंतु, श्रीमती बर्गे हया अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार आवश्यक असलेली हिंदी भाषा परिक्षा दिनांक १९.०१.२०२० रोजी उत्तीर्ण झाल्या असल्याने त्यांना दिनांक ३०.०१.२०२० हा नियमित पदोन्नतीचा दिनांक देण्यात आला आहे. |
| ७. | श्री. जीवन दत्तात्रय गलांडे | ४६ | ४६ | संदर्भीय तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीमध्ये माझे नावाची नोंद अ.क्र. ४६ ला असून माझी उपजिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातून अपर जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नती ही दि.०३.१०.२०१७ रोजी झालेली असून संदर्भाधीन यादीतील अ.क्र. २३ ते ३१, ३३ व ४५ समोर नमुद केलेल्या अधिकारी यांची उपजिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातून अपर जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नती दि.३०.०१.२०२० च्या शासन आदेशानुसार झालेली आहे. माझी पदोन्नती ही अ.क्र. २३ ते ३१, ३३ व ४५ समोर नमुद केलेल्या अधिकारी यांचे अगोदर झालेली असलेने माझे नाव सदर ज्येष्ठतासूचीमध्ये अ.क्र. २३ ते ३१, ३३ व ४५ यांचे वरील अनुक्रमांकास येणे आवश्यक आहे. तरी त्याप्रमाणे संदर्भीय ज्येष्ठतासूचीमध्ये दुरुस्ती करणेत यावी. | महसूल व वन विभागाने उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द झालेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीच्या आधारे अपर जिल्हाधिकारी संवर्गात सन २०१७ ते सन २०२२ या कालावधीत झालेल्या सर्व तात्पुरत्या/तदर्थ पदोन्नत्या सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळाच्या सहमतीने नियमित केल्या आहेत. त्यानुसार सेवाज्येष्ठतेनुसार व पद उपलब्धतेनुसार श्री. गलांडे यांना अपर जिल्हाधिकारी संवर्गाचा नियमित दिनांक देण्यात आला आहे. |
| ८. | डॉ. अनंत गव्हाणे | १३६ | १३६ | महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे कडील निवडसुची मध्ये माझा नावाचा समावेश श्री.धनंजय अनिल गोगटे यांच्या नंतर आहे. त्यानुसार सदर अपर जिल्हाधिकारी संवर्गातील ज्येष्ठता सुची मध्ये माझ्या नावाचा समावेश अ.क्र. ७७ वर श्री. धनंजय अनिल गोगटे यांचे नावानंतर व | महसूल व वन विभागाने उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द झालेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीच्या आधारे अपर जिल्हाधिकारी संवर्गात सन २०१७ ते सन २०२२ या कालावधीत झालेल्या सर्व तात्पुरत्या/तदर्थ पदोन्नत्या सामान्य |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | श्री.सुरज रोहीदास वाघमारे यांचे वरील क्रमांकावर करण्यात यावा. | प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळाच्या सहमतीने नियमित केल्या आहेत. सदर नियमित निवडसुचीनुसार श्री. गव्हाणे स्थान देण्यात आले आहे. |
| ९. | श्री. मृणालिनी दत्तात्रय सावंत | १२४ | १२४ | माझे नाव सदर ज्येष्ठता यादीत अ.क्र. १२४ वर नमूद असून त्यामध्ये खालीलप्रमाणे दुरुस्ती करण्यात यावी.<br>१) नाव- **मृणा**लिनी दत्तात्रय सावंत<br>२) सेवानिवृत्ती दिनांक ३१.१२.२०३२ ऐवजी ३१.१२.२०३४ असा करण्यात यावा. | सेवापुस्तकातील नोंदीनुसार श्रीमती मृणालिनी दत्तात्रय सावंत तसेच त्यांच्या सेवानिवृत्ती दिनांकामध्ये ३१.१२.२०३४ अशी दुरुस्ती करण्यात येत आहे. |
| १०. | श्रीमती प्रज्ञा बडे-मिसाळ | १०८ | १०८ | १. उपरोक्त विषयान्वये नमूद करू इच्छिते की, सदर प्रसिध्द यादीमध्ये माझे नाव हे अ.क्र. १०८ वर समाविष्ट करण्याला माझी हरकत आहे.<br>२. माझे नाव हे सन २००० च्या उप जिल्हाधिकारी यांच्या माझ्या बॅचमधील तात्पुरत्या सेवा ज्येष्ठता यादीतील अ.क्र. ५४ श्री. अजय सुभाष मोरे यांचे नंतर व अ.क्र.५५ श्रीमती फरोग अखतर गुलाम रसूल मुकादम, यांचे आगोदर असणे आवश्यक आहे.<br>३. तथापि माझ्या पेक्षा कनिष्ठ असलेल्या अधिकारी यांना माझ्या वरचे स्थान देवून मला सेवाज्येष्ठता यादीतील अ.क्र. १०८ वर टाकण्यात आलेले आहे. हा बदल का करण्यात आला आहे, ह्याचा उलगडा होत नाही.<br>४. मी पदोन्नती साठी आवश्यक असलेली हिंदी भाषा परिक्षा दिनांक १५ मार्च, २०२१ रोजी उत्तीर्ण झालेली असतानाही मला पदोन्नती देताना डावलण्यात येवून विशिष्ट लोकांना यादीत वर घेणेसाठी मला जाणीवपूर्वक डावलण्यात आले आहे.<br>५. उपरोक्त नमूद परिपत्रकानुसार अपर जिल्हाधिकारी संवर्गाची दिनांक ०१/०१/२०१७ ते दिनांक ३१/१२/२०१४ पर्यंतची दिनांक ०१/०१/२०२५ रोजी ची स्थिती तात्पुरती (Provisional) सेवाजेष्ठता सूची ही महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनीयम) नियमावली २०२१ मधील परिशिष्ट तीन च्या विहित | महसूल व वन विभागाने उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द झालेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीच्या आधारे अपर जिल्हाधिकारी संवर्गात सन २०१७ ते सन २०२२ या कालावधीत झालेल्या सर्व तात्पुरत्या/तदर्थ पदोन्नत्या सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापना मंडळाच्या सहमतीने नियमित केल्या आहेत.<br>श्रीमती बडे-मिसाळ हया अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार आवश्यक असलेली हिंदी भाषा परिक्षा दिनांक १५.०३.२०२१ रोजी उत्तीर्ण झाल्या असल्याने त्यांना दिनांक १८.०८.२०२२ हा नियमित पदोन्नतीचा दिनांक देण्यात आला आहे. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | नमुन्यातच नसल्यामुळे ही ab-initio illegal (सुरवातीपासून बेकायदेशीर) आहे.<br>६. तसेच सदरची ज्येष्ठता यादी ही नियम ५ नुसार दरवर्षाची देखील नाही त्यामुळे ही यादी ab-initio illegal (सुरवातीपासून बेकायदेशीर) आहे.<br>७. उपरोक्त नमूद परिपत्रकाच्या संदर्भात शासन निर्णय दिनांक २१/१०/२०११ चा संदर्भ देण्यात आलेला आहे. वास्तविक सदर शासन निर्णय हा दिनांक २१/०६/२०२१ रोजीच्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनीयम) नियमावली २०२१ द्वारे अधिक्रमित करण्यात आला आहे. त्यामुळे सदर शासन<br>निर्णय हा अस्तित्वातच नसताना त्याचा संदर्भ देणे योग्य नाही. | |
| ११. | श्री. किरण बी. महाजन | १०९ | १०९ | माझी निवड खुल्या प्रवर्गातुन झाली असून माझी जात हिंदु-लिंगायत अशी आहे. तरी, अंतिम यादीमध्ये माझ्या नावासमोर इमाव ऐवजी खुला प्रवर्ग अशी नोंद घेण्यात यावी. | सेवापुस्तकातील नोंदीनुसार इमाव ऐवजी खुला अशी नोंद घेण्यात आली आहे. |
| | अनु. क्र. १२ ते अनु. क्र. १९ येथील अपर जिल्हाधिकारी संवर्गातील अधिका-यांनी घेतलेले आक्षेप हे सारखेच असून त्याबाबत विभागाचे अभिप्राय पुढीलप्रमाणे आहेत:- | | | | |
| १२. | श्री. के. सुर्य कृष्णमूर्ति | १४० | १४० | उपरोक्त नमूद परिपत्रकानुसार अपर जिल्हाधिकारी संवर्गाची दि.०१.०१.२०१७ ते दि. ३१.१२.२०२४ पर्यंतची दि.०१.०१.२०२५ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूची ही म.ना.से. (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील परिशिष्ट तीन च्या विहीत नमुन्यातच नसल्यामुळे ही यादी ab-initio illegal आहे. | अपर जिल्हाधिकारी संवर्गाची दि.०१.०१.२०१७ ते दि. ३१.१२.२०२४ पर्यंतची दि.०१.०१.२०२५ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूची ही म.ना.से. (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील परिशिष्ट तीन मध्ये नमूद केलेल्या विवरणपत्रानुसार आहे. त्याचप्रमाणे आवश्यकतेनुसार अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द करतेवेळी किरकोळ सुधारणा करण्यात आल्या आहेत. |
| १३. | श्रीमती समिक्षा चंद्राकर | १०२ | १०२ | तसेच सदरची ज्येष्ठतायादी ही म.ना.से. (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ मधील नियम ५ नुसार दरवर्षाची देखील नाही. त्यामुळे ही यादी ab-initio illegal आहे. | अपर जिल्हाधिकारी संवर्गाची<br>१. दिनांक ०१.०१.२००६ ते दिनांक ३१.१२.२०१० या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०५.०७.२०१६, दिनांक ०१.०१.२०११ ते दिनांक ३१.१२.२०११ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०३.०५.२०१७ रोजी, दिनांक ०१.०१.२०१२ ते दिनांक |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | ३१.१२.२०१६ या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची दिनांक ०५.०७.२०२१ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे.<br>परिणामी, विभागास सन २०१७-२०२४ या कालावधीची व दिनांक ०१.०१.२०२५ रोजीची स्थिती दर्शविणारी ज्येष्ठतासूची प्रसिध्द करतेवेळी त्या वर्षी कार्यरत असलेल्या सर्व अपर जिल्हाधिकारी संवर्गातील अधिका-यांचा समावेश असलेली एकत्रित ज्येष्ठतासूची प्रसिध्द करणे शक्य झाले नाही. |
| १४. | डॉ. नितीन महाजन | ७८ | ७८ | उपरोक्त नमूद परिपत्रकाच्या संदर्भात शासन निर्णय दि. २१.१०.२०११ चा संदर्भ देण्यात आलेला आहे. वास्तविक सदर शासन निर्णय हा दि, २१.०६.२०२१ रोजीच्या म.ना.से. (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ द्वारे अधिक्रमित करण्यात आलेला आहे. त्यामुळे सदर शासन निर्णय हा अस्तित्वातच नसतांना त्याचा संदर्भ देणे योग्य नाही. | संदर्भामध्ये नमूद केलेला दिनांक २१.१०.२०११ रोजीचा शासन निर्णयाचा संदर्भ वगळण्यात आला आहे. |
| १५. | श्री. अजिंक्य पडवळ | १३८ | १३८ | उपरोक्त नमूद परिपत्रकाच्या परिच्छेद क्र. ४ मध्ये असे नमूद करण्यात आले आहे की यापूर्वी दि. ०५.०८.२०२१ रोजी प्रसिध्द करण्यात आलेली तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूची ही अधिक्रमित करण्यात येत आहे. दि.०५.०८.२०२१ ची तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूची अधिक्रमित करण्यात येत असल्यास, त्या तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूचीच्या आधारे दि.०४.१०.२०२१ रोजी झालेली आस्थापना मंडळाची. बैठक ही देखील आपोआप रद्द होईल व त्या बैठकीच्या आधारे दिलेल्या पदोन्नत्या देखील आपोआप रद्द होतील. तरी दि.०५.०८.२०२१ ची तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूची अधिक्रमित करण्यात येत असल्यास त्या पदोन्नत्या देखील रद्द केल्याबाबत आदेश काढण्यात यावे. | महसूल व वन विभागाने उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या दिनांक ३१.१२.२०२० रोजी प्रसिध्द झालेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीच्या आधारे अपर जिल्हाधिकारी संवर्गात सन २०१७ ते सन २०२२ या कालावधीत झालेल्या सर्व तात्पुरत्या/तदर्थ पदोन्नत्या आस्थापना मंडळाच्या सहमतीने नियमित केल्या आहेत. परिणामी, दिनांक ०५.०७.२०२१ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीमध्ये अधिका-यांच्या ज्येष्ठतेमध्ये बदल झाला आहे. परिणामी, सन २०१७ व त्यापुढील कालावधीची अपर जिल्हाधिकारी संवर्गाची सुधारीत ज्येष्ठतासूची प्रसिध्द करणे आवश्यक असल्याने करण्याकरीता दिनांक ०५.०८.२०२१ रोजी प्रसिध्द केलेली तात्पुरती ज्येष्ठतासूची अधिक्रमित (रद्द करण्यात आलेली नाही) करण्यात आलेली आहे. सबब, दिनांक ०५.०८.२०२१ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | रोजीच्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीच्या आधारे देण्यात आलेल्या पदोन्नत्या रद्द करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. |
| १६. | श्री. अशोक विष्णू पाटील | ६७ | ६७ | दि.०४.१०.२०२१ रोजीच्या बैठकीत अपर जिल्हाधिकारी (निवड श्रेणी) पदावर दिलेल्या पदोन्नतीबाबत मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने मूळ अर्ज क्र. २२२/२०२२ मध्ये दि.२९.०३.२०२३ रोजी दिलेल्या निकालाची अंमलबजावणी (मा. उच्च न्यायालयाने याआदेशास स्थगिती दिलेली नसल्यामुळे) न करताच शासनाने संबंधित अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेच्या दिनांकात केलेले बदल (०३.१०.२०१७ ऐवजी ३०.०१.२०२०) हे न्यायाधिकरणाच्या आदेशाचे अवमान करणारे आहे. | मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने मूळ अर्ज क्र. २२२/२०२२ मध्ये दि.२९.०३.२०२३ रोजी दिलेल्या निर्णय शासनास अमान्य असल्याने सदर निर्णयाविरुध्द शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र. ५८२१/२०२३ दाखल करण्यात आली आहे. |
| १७. | श्री. राजेंद्र मुठे | १०३ | १०३ | उपरोक्त परिपत्रकात ज्या अधिकाऱ्यांना दि.३०.०१.२०२० रोजी पदोन्नती दिली आहे त्यांना दि. ०३.१०.२०१७ ची ज्येष्ठता देण्यात आली आहे. मात्र अशा पध्दतीने ज्येष्ठता दिनांक देण्यापूर्वी सदर अधिकाऱ्यांना कोणत्या निकषाच्या आधारे व दि.०३.१०.२०१७ रोजी ते खालच्या पदावर (उपजिल्हाधिकारी (निवड श्रेणी) पदावर) कार्यरत नसतांना देखील, त्यांना अपर जिल्हाधिकारी पदाचे दिनांक देण्यात येत आहेत हे स्पष्ट करण्यात आले नाही. अशा पध्दतीने संबंधित अधिकारी हे त्या संवर्गात रुजु झाले नसतांना व त्यांना मानीव दिनांक देण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाचे शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१५/व्हीआयपी २१०/प्र.क्र.४१२/का-१२, दिनांक २१.०८.२०१५ नुसार सामान्य प्रशासन विभागाची व वित्त विभागाची मान्यता घेतलीच नसतांना, संबंधित अधिकारी यांना कोणत्या नियमाच्या आधारे दि.०३.१०.२०१७ ची ज्येष्ठता | महाराष्ट्र उप जिल्हाधिकारी (सेवाप्रवेश, जेष्ठता निश्चित करणे व स्थायीकरण) नियम १९७७ मधील तरतुदीनुसार उप जिल्हाधिकारी संवर्गातील पात्र अधिका-यांना उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात पदोन्नतीचा दिनांक देण्याबाबत तरतुद करण्यात आली आहे. विभागाने यापुर्वी निर्गमित केलेल्या शासन आदेशानुसार पात्र उप जिल्हाधिका-यांना पुर्वीचे दिनांक प्राप्त झाले आहेत. ज्या अधिका-यांना अपर जिल्हाधिकारी संवर्गात दिनांक ३०.०१.२०२० रोजीच्या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली आहेत, अशा अधिका-यांना उप जिल्हाधिकारी संवर्गातील दिनांक १२.१२.२०१२ वा त्या पुढील उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गाचे दिनांक प्राप्त झाले आहेत. अपर जिल्हाधिकारी संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात ३ वर्ष पुर्ण करीत असलेले अधिकारी हे अपर जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नतीस पात्र ठरतात. दिनांक ३०.०१.२०२० च्या आदेशान्वये ज्या अधिका-यांना अपर |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | देण्यात आली आहे हे स्पष्ट करण्यात आलेले नाही. | जिल्हाधिकारी संवर्गात पदोन्नती देण्यात आली आहे व त्या अधिका-यांना आता, सुधारीत दिनांक ०३.१०.२०१७ रोजीची ज्येष्ठता देण्यात आली आहे, या सर्व अधिका-यांना उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) पदावर ३ वर्ष वा त्यापेक्षा अधिक कालावधी पुर्ण झालेला आहे. |
| १८. | श्री. सत्यनारायण बजाज | १०० | १०० | उपरोक्त नमूद परिपत्रकात असे नमूद करण्यात आले आहे की सदर तात्पुरती (provisional) ज्येष्ठतासूची ही मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे सुरु असलेले मूळ अर्ज क्र. २३६/२०२१ च्या अंतिम निर्णयास अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे. सदर मूळ अर्जामध्ये दि. १४.०८.२०१९ रोजी उपजिल्हाधिकारी (निवड श्रेणी) पदावरील बेकायदेशीर तदर्थ पदोन्नतीचे आदेश तसेच दि. ३०.०१.२०२० रोजीचे तदर्थ पदोन्नतीचे आदेश आव्हानित करण्यात आले आहे. याबाबत सदर परिपत्रकात उल्लेख करण्यात आलेले नाही | महाराष्ट्र उप जिल्हाधिकारी (सेवाप्रवेश, जेष्ठता निश्चित करणे व स्थायीकरण) नियम १९७७ मधील तरतुदीनुसार उप जिल्हाधिकारी संवर्गातील पात्र अधिका-यांना उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गात पदोन्नतीचा दिनांक देण्याबाबत तरतुद करण्यात आली आहे. उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गाकरीता वेगळयाने पदे निश्चित करण्यात आलेली नाहीत. तसेच, उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) उप जिल्हाधिकारी संवर्गाच्या कर्तव्ये व जबाबदा-या हया सारख्याच आहेत. प्रसंगत: नमूद करण्यात येते की, उप जिल्हाधिकारी संवर्गाचे सेवाप्रवेश नियम प्रसिध्द केल्यापासून आजतागायत उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गाची वेगळयाने ज्येष्ठतासूची तयार करण्यात आलेली नाही वा ठेवण्यात येत नाही.<br>तसेच, अपर जिल्हाधिकारी संवर्गाची तात्पुरती/अंतिम ज्येष्ठतासूची ही मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मुळ अर्ज क्र. २३६/२०२१ व क्र. २३७/२०२१ या मुळ अर्जाच्या अनुषंगाने मा. न्यायाधिकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहुन प्रसिध्द करण्यात येणार आहे. परिणामी, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे अंतिम आदेश विचारात घेऊन त्याप्रमाणे पुढील कार्यवाही करण्याबाबतची तजवीज ठेवण्यात आली आहे. |
| १९. | श्री. हनुमंत आरगुंडे | १५७ | १५७ | उपरोक्त परिपत्रकात मा. उच्च न्यायालयाच्या (औरंगाबाद खंडपीठाने) रिट याचिका क्र. १२६७५/२०२२ मध्ये दि. ३१.०१.२०२३ रोजी पारित केलेल्या आदेशाच्या परिच्छेद ६ मधील उल्लेख | अपर जिल्हाधिकारी संवर्गाची तात्पुरती/अंतिम ज्येष्ठतासूची ही मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथील मुळ अर्ज क्र. २३६/२०२१ व क्र. २३७/२०२१ या मुळ अर्जाच्या अनुषंगाने मा. न्यायाधिकरणाच्या अंतिम निर्णयाच्या |

